**शासकीय कृपा महिला वसतीगृह, कर्जत, जि.रायगड या संस्थेच्या सुधारित भाडे करारास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/ प्र.क्र.१८१/का-२**

नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ डिसेंबर, २०२१.

वाचा :- १. उप आयुक्त (महिला विकास),महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्रमांक मबाविआ/ मवि/शाकृमव/इमारत भाडेप्रस्ताव/का-६/२०२०-२१/१६०२, दिनांक १३.०३.२०२१

२. शासन निर्णय क्रमां २०१७/प्रक्र.१८१/का-२, दि.३१ जुलै,२०१७ व शुध्दीपत्रक समक्रमांक, दि.२४.१०.२०१७.

३. वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्रक्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५

४. वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दिनांक १४ ऑक्टोबर,२०२१.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत महिला व बालकांच्या विकासाकरीता राबविण्यात येत असलेल्या विविध विकास योजनेखाली शासकीय कृपा महिला वसतीगृह कर्जत, ता.कर्जत,जि.रायगड ही संस्था कार्यरत असून या संस्थेच्या जागेकरीता शासकीय इमारत उपलब्ध नसल्याने सदर सस्था खाजगी इमारतीमध्ये भाडे तत्वावर घेण्यात आलेल्या जागेमध्ये चालविण्यात येत आहे. सदर संस्थेने श्री भगवान लक्ष्मण लाड आणि सौ.सुरेखा भगवान लाड यांच्या मालकीच्या नगर परिषद हद्यीतील इमारत गट नं.१०३ प्लॉट नं.१,२ व ३, श्री मल्हार प्रसाद, बी विंग,ललानी कॉलनी दहिवली, ता.कर्जत, जि.रायगड येथे असलेल्या इमारतीमध्ये भाडयाने जागा घेतली आहे. यापूर्वी संस्थेने इमारत मालकासोबत केलेला भाडेकरार संपूष्टात आला आहे. तसेच कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,पनवेल,ता.कर्जत,जि.रायगड यांनी सदर संस्थेकरीता शासकीय इमारत उपलब्ध नसल्याचे प्रमाणपत्र दिले आहे आणि ८०७.२० स्क्वेअर मिटर इतक्या क्षेत्रफळाकरीता शासकीय दराने दरमहा रु.१,४९,०४९/- इतके भाडे मंजूर केले असल्याने शासकीय कृपा महिला वसतीगृह कर्जत,जि.रायगड या संस्थेच्या जागेकरीता १.११.२०१९ पासून ३ वर्षाकरीता नव्याने भाडे करार करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये मुंबई,नवी मुंबई,ठाणे,पुणे,पिंपरी-चिंचवड,नागपूर,औरंगाबाद येथील कार्यालयीन इमारती वगळता अन्य प्रदेशातील प्रत्येक कार्यालयीन इमारतीसाठी प्रति महा रु.५०,०००/- पर्यंत भाडे मंजूरीचे अधिकार विभाग प्रमुख यांना देण्यात आले असून त्या रकमेवरील असणाऱ्या भाडयाच्या रक्कमेस मंजूरीचे पूर्ण अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले असल्याने कृपा महिला वसतीगृह कर्जत,ता.कर्जत,जि.रायगड या संस्थेच्या जागेकरीता करण्यात आलेल्या नवीन इमारत भाडे करारास मान्यता देण्याचा प्रस्ताव महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी सादर केला असल्याने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या मान्यतेस्तव विचाराधिन होती. त्यामुळे प्रस्तुत प्रकरणी खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शासकीय कृपा महिला वसतिगृह कर्जत, ता.कर्जत, जि.रायगड या संस्थेने शासकीय इमारत उपलब्ध नसल्याने संस्थेकरीता श्री भगवान लक्ष्मण लाड आणि सौ.सुरेखा भगवान लाड यांच्या मालकीच्या नगर परिषद हद्यीतील इमारत गट नं.१०३ प्लॉट नं.१,२ व ३, श्री मल्हार प्रसाद, बी विंग,ललानी कॉलनी दहिवली,

ता.कर्जत, जि.रायगड येथे असलेल्या इमारतीमध्ये भाडयाने जागा घेतली असून इमारत मालकासोबत दिनांक १.०३.२०१७ ते दि.३१.१०.२०१९ या कालावधीकरीता दरमहा रु.१७२,८८४/- इतक्या दराने भाडे आकारणीचा करार केला होता. संस्थेने इमारत मालकासोबत केलेला भाडेकरार संपूष्टात आला आहे. तसेच कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग,पनवेल,ता.कर्जत,जि.रायगड यांनी सदर संस्थेकरीता शासकीय इमारत उपलब्ध नसल्याचे प्रमाणपत्र दिले आहे आणि ८०७.२० स्क्वेअर मिटर इतक्या क्षेत्रफळाकरीता शासकीय दराने दरमहा रु.१,४९,०४९/- इतके भाडे मंजूर केले असल्याने शासकीय कृपा महिला वसतीगृह कर्जत,जि.रायगड या संस्थेच्या जागेकरीता १.११.२०१९ पासून ३ वर्षाकरीता नव्याने भाडे करार करण्यात आला आहे.

शासकीय कृपा महिला वसतिगृह कर्जत, ता.कर्जत, जि.रायगड या संस्थेच्या जागेकरीता इमारत मालकासोबत करण्यात आलेल्या कराराचा कालावधी संपुष्टात आल्याने इमारत मालकासोबत दिनांक १.११.२०१९ ते ३१.१०.२०२२ या कालावधीकरीता दरमहा रु.१,४९,०४७/- इतके भाडे आकारणीचा करार करण्यात आला आहे. या सुधारित घरभाडे प्रस्तावास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

शासकीय कृपा महिला वसतिगृह कर्जत, ता.कर्जत, जि.रायगड या संस्थेने श्री भगवान लक्ष्मण लाड आणि सौ.सुरेखा भगवान लाड यांच्या मालकीच्या नगर परिषद हद्यीतील इमारत गट नं.१०३ प्लॉट नं.१,२ व ३, श्री मल्हार प्रसाद, बी विंग,ललानी कॉलनी दहिवली, ता.कर्जत, जि.रायगड येथे असलेल्या इमारतीच्या भाडयापोटी दरमहा रु.१,४९,०४७/- याप्रमाणे होणारा खर्च हा लेखाशिर्ष २२३५ १२५४ (योजनेत्तर) या लेखाशिर्षाखाली भाडेपट्टी व कर या उद्यिष्टसाठी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाकरीता संकेतांक क्रमांक २०२११२१५११५०५००९३० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sharad Laxman Ahire

Digitally signed by Sharad Laxman Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b9bd688b9963b30401eb5b16e2839c534797f7c0241ad6e715d237585caf58e7, serialNumber=cbebc5baaa1e92d127127b9ea6c25d4909188956d5d79d31ff8978b7bfd8fc57, cn=Sharad Laxman Ahire
Date: 2021.12.15 11:51:46 +05'30'

**( श. ल. अहिरे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
२. मा.अध्यक्ष /उपाध्यक्ष (विधानसभा) विधानमंडळ, मुंबई.
३. मा.सभापती /उपसभापती (विधानपरिषद),विधानमंडळ, मुंबई.
४. प्रधान सचिव,महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२.
५. आयुक्त, महिला व बाल विकास, म.रा.पुणे.
६. उप आयुक्त, (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
७. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता ) /(लेखा परिक्षा),मुंबई/नागपूर.
८. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (सर्व)
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखापिरक्षा अधिकारी, मुंबई.
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१२. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,रायगड.

१३. अधीक्षिका, शासकीय कृपा महिला वसतिगृह,कर्जत, जि.रायगड.
१४. सह सचिव /उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१५. कक्ष अधिकारी(का-४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१६. निवड नस्ती (का-२), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.